**मराठी भाषा संवर्धन पंधरवड्याच्या निमित्ताने विविध कार्यक्रमांचे आयोजन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: मभावा-२०१९/प्र.क्र.९३/भाषा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १९ डिसेंबर, २०१९

वाचा :- शासन परिपत्रक समक्रमांक दिनांक ३ डिसेंबर, २०१९

**शासन परिपत्रक :-**

मराठी भाषेचे वैभव जपण्यासाठी व भाषेच्या संवर्धनासाठी दिनांक १ जानेवारी ते १५ जानेवारी या कालावधीत "मराठी भाषा संवर्धन पंधरवडा"साजरा करण्याबाबत दि.०३.१२.२०१९ च्या परिपत्रकान्वये सूचना देण्यात आलेल्या आहेत. मराठी भाषा संवर्धन पंधरवड्याच्या अनुषंगाने मराठी भाषा विभागामार्फत मंत्रालयीन विभागातील अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी खालील स्पर्धा व कार्यक्रम आयोजित करण्यात येत आहेत-

**१) वृक्ष लागवड व वृक्षारोपण यासंबंधी घोषवाक्य स्पर्धा -**

हवामान आणि वातावरण यामध्ये होणाऱ्या बदलाच्या गंभीर समस्यांची तीव्रता कमी करण्यासाठी ५० कोटी वृक्ष लागवड करण्याचा महत्वाकांक्षी कार्यक्रम शासनाने सन २०१६ पासून हाती घेतलेला आहे. वृक्ष लागवड, संवर्धन आणि संगोपन हा कार्यक्रम अधिक गतीने व कार्यक्षमतेने राबविण्यासाठी राज्य शासनाच्या सर्व प्रशासकीय विभागांना समर्पित निधीदेखील उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. शासनाची ही योजना यशस्वीपणे राबविण्यासाठी जनसामान्यांना आवाहन करण्यासाठी जानेवारी २०२० मध्ये आयोजित करण्यात येणाऱ्या भाषा पंधरवड्यात "वृक्ष लागवड व वृक्षारोपण" यासंबंधी घोषवाक्ये तयार करण्याची स्पर्धा आयोजित करण्यात येत आहे. वृक्ष लागवड, संवर्धन आणि संगोपन ही सर्वांना आपली जबाबदारी वाटावी व या कार्यक्रमाची अंमलबजावणी प्रभावीपणे व्हावी यासाठी जनजागृती करणारी घोषवाक्ये १ ते २ वाक्यात बनविणे अपेक्षित आहे.

सदर घोषवाक्ये ई-मेलव्दारे मागविण्यात येतील. यासाठी परिक्षक नेमून त्यांच्यामार्फत घोषवाक्यांची तपासणी करून चांगल्या घोषवाक्यांची निवड करण्यात येईल. साधारणपणे १० चांगली घोषवाक्ये निवडण्यात येतील. त्यांचा वापर भविष्यात वृक्ष लागवड, संवर्धन आणि संगोपनाच्या प्रचार, प्रसारासाठी करता येईल. प्रत्येक चांगल्या घोषवाक्यासाठी विजेत्याला त्याच्या आवडीचे मराठी भाषेतील पुस्तक घेण्यासाठी रू. ५००/- इतक्या किंमतीचे प्रमाणक बक्षीस म्हणून देण्यात येईल. त्यातून मराठी पुस्तक देण्याच्या सूचना पुस्तकालयास देण्यात येतील.

सदर स्पर्धेत सहभागी होण्यासाठी इच्छुकांनी आपले नाव, पदनाम, विभाग, भ्रमणध्वनी व घोषवाक्ये इ. माहिती पुढील ई-मेलवर दि.२६.१२.२०१९ पर्यत पाठवावी.

email- ashok.bharate@nic.in

**२) निबंधस्पर्धा** - मराठी भाषेच्या संवर्धनासाठी मराठीतून बोलण्यासोबतच मराठीतून वाचन, लेखनाचेही तितकेच महत्व आहे. विचार व्यक्त करण्यासाठी लेखन हे प्रभावी माध्यम आहे. ही बाब लक्षात

घेऊन पुढील काही विषयावर निबंधस्पर्धा भाषा पंधरवड्यात आयोजित करण्यात येत आहे. खालीलपैकी कोणत्याही एका विषयावर ५०० शब्दात निबंध लिहावयाचा आहे.

१. जागतिक तापमानवाढ - कारणे आणि उपाययोजना
२. पर्यावरण संरक्षण व संवर्धन - मानवाची नैतिक जबाबदारी
३. महिला सबलीकरण व सुरक्षा
४. योग आणि आहार यांचे आजच्या जीवनातील महत्व
५. समाजमाध्यमांचा (सोशल मिडिया) दैनंदिन जीवनावरील प्रभाव

सदर स्पर्धेत पहिल्या ३ क्रमांकाना अनुक्रमे रू.२०००/-, १५००/- व १०००/- व उत्तेजनार्थ रू.५००/- असे बक्षीस देण्यात येईल. सदर निबंध ई-मेलव्दारे मागविण्यात येतील. निबंधाची निवड करण्याचे काम वरील परिक्षकांमार्फत करण्यात येईल. सदर स्पर्धेत पहिल्या ३ क्रमांकांना अनुक्रमे रू.२०००/-, १५००/- व १०००/- व उत्तेजनार्थ रू.५००/- असे बक्षीस देण्यात येईल. सदर स्पर्धेत सहभागी होण्यासाठी इच्छुक असलेल्या अधिकारी/कर्मचा-यांनी आपले नाव, पदनाम, विभाग, भ्रमणध्वनी व निबंध इत्यादी तपशील पुढील ई-मेलवर दि.२६.१२.२०१९ पर्यत पाठवावा.

email- nanda.raut@nic.in

**३) "चालता-बोलता"- प्रश्नसरिता कार्यक्रम (दि. ०६.०१.२०२० रोजी)**

मंत्रालयातील त्रिमूर्ती प्रांगणात सोमवार दि.०६.०१.२०२० रोजी सकाळी १० ते सायंकाळी ५ या वेळेत मराठी भाषेमधील म्हणी, वाक्प्रचार व इंग्रजी शब्दांना पर्यायी मराठी शब्द तसेच मराठी साहित्य/साहित्यिक, कथा, कादंबऱ्या, लेखक यांच्यावर आधारीत प्रश्नांचा कार्यक्रम आयोजित केला आहे. या कार्यक्रमात सहभागी होऊन जो बरोबर उत्तर देईल त्यास तत्काळ आकर्षक बक्षिस दिले जाईल.

**४) मुलाखतीचा व काव्यवाचनाचा कार्यक्रम :- (दि. ०७.०१.२०२० रोजी)**

मंत्रालयातील त्रिमूर्ती प्रांगणांत मंगळवार, दि.०७.०१.२०२० रोजी सायंकाळी ४.०० ते ५.०० या वेळेत मराठी भाषिक प्रतिथयश व्यक्तींच्या मुलाखतीचा कार्यक्रम व ५.०० ते ६.०० या वेळेत काव्यवाचनाचा कार्यक्रम आयोजित करण्यात आला आहे.

**५) साहित्ययात्री प्रश्नमंजुषा स्पर्धा :- (दि. ०८.०१.२०२० रोजी)**

भाषा पंधरवडयाच्या निमित्ताने मराठी साहित्याचा जागर व्हावा, साहित्यस्मृती उजळून निघाव्यात व वाचकांनी एकत्र यावे यासाठी मंत्रालयीन अधिकारी / कर्मचाऱ्यांसाठी आगळी वेगळी स्पर्धा आयोजित करण्यात येत आहे. सदर स्पर्धेमध्ये साहित्यावर आधारित प्रश्नांचा समावेश असेल. श्री. विनोद देशपांडे, ध्रुव नॉलेज वेल्फेअर सोसायटी यांच्यामार्फत ही स्पर्धा घेण्यात येईल. सदर स्पर्धेत किमान ३ ते ५ जणांचे जास्तीत जास्त १० संघ सामील होतील. सदर स्पर्धा दोन फेऱ्यात घेतली जाईल. पहिला भाग ज्याला “पूर्वरंग” म्हणून ओळखले जाईल. पूर्वरंगामध्ये दोन फेऱ्या ई मेलच्या माध्यमातून घेण्यात येतील. १० पेक्षा अधिक संघांची नोंदणी झाल्यास, त्या संघांतील पूर्वरंग फेऱ्यांच्या गुणांवरून पहिल्या दहा संघांना निवडले जाईल. या दहा संघांनी “उत्तररंग”साठी ८ जानेवारी, २०२० रोजी स्पर्धेमध्ये सामील व्हायचे आहे. दुसरा भाग “उत्तररंग” म्हणून ओळखला जाईल. यात उपांत्य आणि अंतिम मिळून ८ फेऱ्या घेतल्या जातील. उत्तररंगाच्या सर्व

फेऱ्यांसाठी मिळून दोन ते सव्वा दोन तासांचा वेळ अपेक्षित आहे. सदर स्पर्धेतील पहिल्या ३ यशस्वी संघांना अनुक्रमे रू. ७०००/-, ५०००/- व ३०००/- असे बक्षिस देण्यात येईल.

सदर स्पर्धेत सहभागी होण्यासाठी इच्छुकांनी ३-५ जणांचा संघ करुन आपले नाव, पदनाम, विभाग, भ्रमणध्वनी इ. माहिती पुढील ई-मेलवर दि.२६.१२.२०१९ पर्यत पाठवावी.

email- ashok.bharate@nic.in

स्पर्धेच्या माहितीसाठी संपर्क १. श्री.विनोद देशपांडे - ९८१९७७३९७०
२. श्री. हेरंब ओक - ९७६९९४६८८८

सर्व मंत्रालयीन विभागातील अधिकारी/कर्मचारी यांना घोषवाक्य स्पर्धा व निबंध स्पर्धेत सहभागी होण्याचे व कार्यक्रमांना उपस्थित राहण्याचे आवाहन करण्यात येत आहे. मंत्रालयातून सेवानिवृत्त झालेले कर्मचारीदेखील उपरोक्त सर्व स्पर्धांमध्ये भाग घेऊ शकतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१९१२१९१७४७५५००३३ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajashri Uday Bapat

Digitally signed by Rajashri Uday Bapat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Marathi Language Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0abe21e41785319194707f89dc0e9ab5156282f4a89952d9774a26fade711538, serialNumber=2976929866c57c5b5b45c06bbd6c5983fe47bad04262c22cb9ec519621a4899f, cn=Rajashri Uday Bapat
Date: 2019.12.19 18:09:44 +05'30'

**( राजश्री बापट )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
३) मा.मुख्य सचिव / अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
४) महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
७) सर्व मंत्रालयीन विभाग, यांना विनंती करण्यात येते की, सदर परिपत्रक त्यांनी त्यांच्या विभागातील सर्व अधिकारी/कर्मचारी यांच्या निदर्शनास आणावे. तसेच उपरोक्त नमुद स्पर्धांमध्ये भाग घेण्यासाठी व कार्यक्रमांना उपस्थित राहण्यासाठी सवलत अधिकारी व कर्मचारी यांना देण्यात यावी.
८) निवडनस्ती (भाषा-२).